**महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषदेकडून घेण्यात आलेल्या शिक्षक पात्रता चाचणी (टीईटी) परिक्षेमध्ये झालेल्या अनियमिततेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.२६८/प्रशा-३**
हुतात्मा राजगुरु चौक,मादामा कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-३२.
दिनांक :- २० डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य परिक्षा परिषदेमार्फत सन २०१९-२०२० मध्ये घेण्यात आलेल्या शिक्षक पात्रता परिक्षेतील (टीईटी) निकालात फेरफार झाल्याचे तसेच त्याअनुषंगाने आर्थिक गैरव्यवहार झाल्याचे निदर्शनास आले आहे. तसेच सदर अनियमिततेमध्ये जी.ए.सॉफ्टवेअर या कंत्राटी कंपनीचा व संबंधित शासकीय अधिकाऱ्यांचा सहभाग दिसून येत असल्याने सदर अनियमिततेच्या अनुषंगाने सविस्तर चौकशी करण्याकरिता मा.अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली चौकशी समिती गठित करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधिन होती. त्यानूसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२०२० मधील महाराष्ट्र राज्य परिक्षा परिषदेमार्फत घेण्यात आलेल्या शिक्षक पात्रता परिक्षेमध्ये (टीईटी) झालेल्या गंभीर अनियमितता प्रकरणी सखोल चौकशी करुन अहवाल सादर करण्यासाठी मा.अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे चौकशी समिती गठित करण्यात येत आहे.

१. अपर मुख्य सचिव , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई - अध्यक्ष
२. आयुक्त, (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे - सदस्य
३. शिक्षण संचालक, (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे - सदस्य
४. शिक्षण संचालक, (माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे - सदस्य
५. संचालक, माहिती व तंत्रज्ञान, संचालनालय, मंत्रालय,मुंबई - सदस्य
६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद , पुणे - सदस्य सचिव

उपरोक्त समितीने सन २०१९-२०२० मध्ये झालेल्या शिक्षक पात्रता परिक्षेमध्ये (टीईटी) तसेच जी.ए.सॉफ्टवेअर कंपनीने केलेल्या कामांमध्ये झालेल्या अनियमिततेची चौकशी करुन त्याबाबतचा प्राथमिक चौकशी अहवाल सात दिवसांत व सविस्तर चौकशी अहवाल १५ दिवसांत मा.मंत्री (शालेय शिक्षण ) यांना सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक २०२११२२०१९०८२३१९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावांने,

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2021.12.20 19:44:50 +05'30'

**( टि.वा.करपते )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३) आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक/ प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे.
५) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त / अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परिषद, पुणे.
७) अवर सचिव, टिएनटी-१, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती (प्रशा-३)